पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा
(पूर्व) परीक्षा - २००९... प्रवेश
प्रमाणपत्राबाबतचे घोषणापत्र.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक- पीएसबी-०३०९/प्र.क्र.९८१/पोल-५अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ दिनांक : २० जानेवारी २०११.

वाचा : (१) शासन परिपत्रक, गृह विभाग क्रमांक- पीएसबी-०३०९/प्र.क्र.९८१/पोल-५अ, दिनांक २ डिसेंबर २०१०.
(२) शासन शुध्दीपत्रक , गृह विभाग क्रमांक- पीएसबी-०३०९/प्र.क्र.९८१/पोल-५अ, दिनांक २२ डिसेंबर २०१०.
(३) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्रमांक-४४२(१ )/मविप/२००९/बारा, दिनांक १९ जानेवारी २०११.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा-२००९ दि.२३ जानेवारी २०११ रोजी मुंबई, नाशिक, अमरावती, नांदेड, पुणे, औरंगाबाद व नागपूर या केंद्रावर घेण्यात येणार आहे. सदर परीक्षेची प्रवेश प्रमाणपत्रे उमेदवारांना आयोगाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन दिल्याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दि. १९ जानेवारी २०११ च्या पत्रानुसार खालील प्रमाणे घोषणा केलेली आहे.

"पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा (पूर्व) परीक्षा-२००९ आयोगामार्फत दिनांक २३ जानेवारी २०११ रोजी रोजी औरंगाबाद, मुंबई, नाशिक, नांदेड, अमरावती, नागपूर व पुणे या जिल्हा केंद्रावर घेण्यात येणार आहे. या परीक्षेकरीता प्रवेश दिलेल्या तसेच प्रवेश नाकारलेल्या उमेदवारांची यादी आयोगाच्या www.mpsc.gov.in या बेबसाईटवर उपलब्ध आहे.

२. प्रस्तुत परीक्षेसाठी प्रवेश दिलेल्या उमेदवारांची प्रवेशपत्रे ऑनलाईन प्रणालीच्या बेबसाईटवर (www.mpsconline.gov.in) उमेदवारांच्या प्रोफाईलआधारे उपलब्ध करुन देण्यात आली आहेत. संबंधित उमेदवारांनी आयोगाच्या ऑनलाईन प्रणालीच्या बेबसाईटवर स्वतःच्या युजर आयडी व पासवर्डद्वारे प्रवेश (Login) करुन प्रिंट या बटनावर क्लिक करुन प्रेवशापत्राची प्रत काढून घ्यावी. सदर प्रवेशपत्र परीक्षेच्यावेळी उमेदवारांनी सोबत आणणे आवश्यक आहे. प्रवेशपत्राशिवाय परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी.

३. प्रवेशपत्र पोस्टाद्वारे पाठविण्यात येणार नाही. तसेच प्रवेशपत्राची दुय्यमप्रत आयोगाकडून किंवा जिल्हाधिकारी कार्यालयाकडून पुरविण्यात येणार नाही.

४. एखादया उमेदवारास उपरोक्त नमूद केल्यानुसार ऑनलाईन प्रणालीद्वारे प्रवेशपत्र उपल्बध करुन घेण्यास (Download) काही अडचण उद्‌भवल्यास उमेदवारांनी ९७५७४४४०२० या दुरध्वनी क्रमांकावर संपर्क साधावा. तसेच प्रेवशासंबंधी काही अडचण आल्यास आयोगाच्या माझगांव, मुंबई येथील कार्यालयात परीक्षेपूर्वी व्यक्तीशः संपर्क साधावा. परीक्षेनंतर प्रवेशासंदर्भांत प्राप्त झालेल्या तक्रारीची दखल आयोगाकडून घेतली जाणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी."

आयोगाची उक्त घोषणा या परिपत्रकाद्वारे सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई या संवर्गातील सर्व कर्मचा-यांच्या (रजेवर/ प्रतिनियुक्तीवर आसणा-या कर्मचा-यांसह) निदर्शनास आणण्यात येत आहे.

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०११०१२०११५२०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सदानंद जाधव )
शासनाचे उपसचिव, गृह विभाग.

प्रति,

१) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोगा, मुंबई (पत्राने)*.
२) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक , महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
४) संचालक , ॲन्टी करप्शन ब्युरो, मुंबई.
५) अप्पर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), पुणे
६) आयुक्त, गुन्हा अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), मुंबई.
७) अपर पोलीस महासंचालक, (प्रशिक्षण व खास पथके ), मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, मुंबई.
९) सर्व पोलीस उपमहानिरीक्षक.
१०) सर्व पोलीस अधीक्षक .
११) सर्व पोलीस आयुक्त, (मुंबई वगळून).
१२) निवड नस्ती पोल-५अ.